**शेतकरी आत्महत्या प्रकरणी आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना तातडीने मदत देण्यासाठी निधी वितरित करण्याबाबत (अनिवार्य) (दत्तमत)**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०२३/प्र.क्र.५०/म-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०२ मे, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र.एससीवाय-१२०५/प्र.क्र.१८९/म-७, दि.१९.१२.२००५
२) शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र.एससीवाय-१२०५/प्र.क्र.१८९/म-७, दि.२३.०१.२००६
३) शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र.एससीवाय-२०२३/प्र.क्र.१७/म-७, दि.१२.०७.२०२३
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१/०४/२०२४

**प्रस्तावना :-**

नापिकी, कर्जबाजारीपणा व कर्ज परतफेडीचा तगादा या तीन कारणांमुळे झालेल्या शेतकरी आत्महत्या प्रकरणी आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना तातडीने मदत देण्यासाठी सहाय्यक अनुदानापोटी मागणी क्र.सी-५, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्ष व कल्याण ०२, समाजकल्याण १०४, वृध्द, अपंग व निराश्रीतांचे कल्याण (००) (०३), आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या वारसांना वित्तीय सहाय्य (अनिवार्य) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) (२२३५ ३१९५) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात रू.२०.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. मागणी क्र.सी-५ अंतर्गत अर्थसंकल्पिय अंदाज सन २०२४-२५ करिता रू.८३.०८ कोटी इतकी तरतूद प्रस्तावित असून त्यापैकी रू.२७.७५ कोटी इतकी तरतूद लेखा अनुदानामध्ये मंजूर करण्यात आली आहे. त्यामुळे २२३५ ३१९५ या लेखाशिर्षामध्ये रू.६.६० कोटी एवढी तरतूद मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळता उर्वरित जिल्हाधिकारी यांना वाटप करण्यासाठी सर्व विभागीय आयुक्त यांना वितरीत करण्याची तसेच प्रत्येक वर्षी शेतकरी आत्महत्यांचा अंदाज बांधणे शक्य नसल्याने उणे प्राधिकार पत्रावर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नापिकी, कर्जबाजारीपणा व कर्ज परतफेडीचा तगादा या तीन कारणांमुळे झालेल्या शेतकरी आत्महत्या प्रकरणी आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना तातडीने मदत देण्यासाठी सहाय्यक अनुदानापोटी मागणी क्र.सी-५, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२, समाजकल्याण १०४, वृध्द, अपंग व निराश्रीतांचे कल्याण-(००) (०३), आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या वारसांना वित्तीय सहाय्य (अनिवार्य)-३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) (२२३५ ३१९५) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार सर्व विभागीय आयुक्त यांना वितरीत करण्यात येत आहे.

**रूपये लाखात**

| अ.क्र. | विभागीय आयुक्त तथा नियंत्रक अधिकारी | वितरीत अनुदानाची रक्कम |
|---|---|---|
| १ | कोकण | १.३३ |
| २ | पुणे | ४४.६७ |
| ३ | नाशिक | १९७.६७ |
| ४ | औरंगाबाद | १५५.३३ |
| ५ | अमरावती | १९७.३३ |
| ६ | नागपूर | ६३.६७ |
| | **एकूण :-** | **६६०.००** |

२. तसेच सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात शेतकरी आत्महत्यांचा अंदाज बांधणे शक्य नसल्याने या लेखाशिर्षाखाली उणे प्राधिकार पत्रावर निधी आहरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. शेतकरी आत्महत्यांच्या प्रकरणांत विहित कार्यवाही तातडीने पूर्ण करून आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना मदत देण्यात यावी.

४. या प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-५, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२, समाजकल्याण १०४, वृध्द, अपंग व निराश्रीतांचे कल्याण (००) (०३), आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या वारसांना वित्तीय सहाय्य (अनिवार्य) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) (२२३५ ३१९५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा ताळमेळ घालण्यात यावा. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

५. सदर आदेश हे वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक ३ वरील शासन परिपत्रकातील तरतुदींस तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८४/२०२४/व्यय-९, दिनांक १८.०४.२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५०२१६४६३१३११९ असा आहे. हा आदेश डिजीटलस्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RELIEF AND REHABILITATION DEPARTMENT,
2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FCF7172A73579B34FA622983D8FB647780FBEF1D35A1CA975955EB9193F3F800, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2024.05.02 16:58:47 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त.
२) सर्व जिल्हाधिकारी,
३) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५) वित्तीय सल्लागार तथा सहसचिव (अर्थ), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सह सचिव (ब-१/२), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) संचालक, लेखा व कोषागारे, मंत्रालय, मुंबई.
७) उप सचिव (अर्थ-६/व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९) कक्ष अधिकारी (म-३/म-११), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (म-७)